सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक बदल्या सन २०२५.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२५/प्र.क्र. ६३ /ऊर्जा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक:- २२ मे, २०२५.

**वाचा:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन अधिसूचना क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.७०/ऊर्जा-५, दि. २४.०५.०२०१८.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (१), (२), (३) व (४) नुसार मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सहाय्यक विद्युत निरीक्षक गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने बदलीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीनंतर पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीमती अनुजा अ. वैद्य, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नागपूर. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, वर्धा येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक या रिक्त पदावर. |
| २. | श्री. चेतन दिपक सुपेकर, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. २, ठाणे. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, मुंबई येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (कक्ष क्र. २) या रिक्त पदावर. |
| ३. | श्री. मंजुनाथ वि. पाटील, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, वाशिम. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, धाराशीव येथील (श्रीमती प्राची पवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| ४. | श्री. राहुल का. फरांदे सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, रत्नागिरी | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, पालघर येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक या रिक्त पदावर. |
| ५. | श्री. प्रशांत दि. मोरे सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, उद्वाहन, मुंबई | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. २, ठाणे येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (मुरबाड) या रिक्त पदावर |
| ६. | श्रीमती प्राची सु. पवार | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, धाराशिव | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, पुणे येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (शहर) या रिक्त पदावर |

| | | | |
|---|---|---|---|
| ७. | श्री. हरीदर्शन सो. सोनावणे | विद्युत निरीक्षक, उद्वाहन, मुंबई | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. १, ठाणे येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (कक्ष क्र. १) या रिक्त पदावर |
| ८. | श्री. राहुल सु. किंवडे, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, (सअमंउनि), चेंबुर, मुंबई | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, कोल्हापुर येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (शहर) या रिक्त पदावर |
| ९. | श्री. उत्कर्ष अ. राऊत, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अहिल्यानगर. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सांताक्रुझ येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (कक्ष क्र. १) या रिक्त पदावर |
| १०. | श्री. सचिन सु. कुंभार सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सिंधुदुर्ग | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, मुंबई येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (कक्ष क्र. ६) या रिक्त पदावर |
| ११. | श्री. निलेश र. अहिरे, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, जळगांव | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नाशिक येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (मालेगाव) या रिक्त पदावर |
| १२. | श्री. शिवराज सं. दुधे सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अमरावती | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, पुणे येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (ग्रामीण) या रिक्त पदावर |
| १३. | श्री. हर्षल दि. गोसावी, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अहिल्यानगर. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. १, ठाणे येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक (कक्ष क्र. २ नवी मुंबई) या रिक्त पदावर. |
| १४. | श्रीमती अमिता तिवारी, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, बुलढाणा. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, यवतमाळ येथील सहाय्यक विद्युत निरीक्षक या रिक्त पदावर. |

२. उपरोक्त स्तंभ क्र. २ मधील नमूद अधिकाऱ्यांकडे सहाय्यक विद्युत निरीक्षक अथवा विद्युत निरीक्षक या पदाचा यापूर्वी सोपविण्यात आलेले अतिरिक्त कार्यभार या शासन आदेशान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत.

३. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना बदलीच्या ठिकाणी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे.

४. तसेच मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांना सूचित करण्यात येते की, उपरोक्त स्तंभ क्र. २ मधील अधिकाऱ्यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याचा प्रस्ताव शासनास **तात्काळ** सादर करावा.

५. महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल**. तसेच, संबंधितांविरूध्द शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन-१४, दि. २३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. वरील अधिकाऱ्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत, असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. सदरहू आदेशानुसार पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करणे तसेच त्यामध्ये बदल करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरूध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. तसेच उपरोक्त तक्त्यात नमुद बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारित केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील), १९७९ मधील नियमांनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरेल.

१०. संबंधित सहाय्यक विद्युत निरीक्षक यांनी नियुक्तीच्या नवीन ठिकाणी **तात्काळ** रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत शासनास न चुकता सादर करावा.

११. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०५२२१८१७१३७७१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT,
2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2025.05.22 18:18:12 +05'30'

**( प्रदिप भिंताडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर (पू.) मुंबई-७१.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई.
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
५) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/पुणे/छ. संभाजीनगर/नागपूर.
६) सर्व संबंधित सहाय्यक विद्युत निरीक्षक (मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत:**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) सहसचिव (ऊर्जा-१), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती (ऊर्जा-१).